


# कृषिशास्त्र

## परिभाषा कोश

भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन

## कृषिशास्त्र परिभाषा समिति
(१९७२ ते १९७८)

**अध्यक्ष**

डॉ. रा. ज. कळमकर
मराठी विज्ञान परिषद, मुंबई
(२५ एप्रिल १९७४ पर्यंत)

डॉ. कृ. रा. ठाकरे
पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला
(१९७४ ते १९७८)

**सदस्य**

श्री. कृ. र. सहस्त्रबुद्धे
पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला

डॉ. सु. श. थोरात
महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी

डॉ. गो. का. झेंडे
महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी

डॉ. र. वि. पंडित
मराठी विज्ञान परिषद, मुंबई

श्री. पु. रा. चोपडे
मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी

श्री. शं. ल. रावते
मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी

श्री. वा. पां. लिमये
कोकण कृषि विद्यापीठ, दापोली

श्री. एस. व्ही. माजगावकर
कोकण कृषि विद्यापीठ, दापोली

**सदस्य-सचिव**

डॉ. न. ब. पाटील

# प्रस्तावना

महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतर मराठी भाषेला राजभाषेचे स्थान मिळाले. साहजिकच महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांत शिक्षणाचे माध्यम मराठी असावे हेही सर्वमान्य झाले. शिक्षण-क्षेत्रातील माध्यमाचे हे परिवर्तन कार्यक्षमतेने घडवून आणण्यात मुख्यत्वेकरून दोन अडचणी होत्या. पहिली अडचण म्हणजे शासकीय कामकाजासाठी व तांत्रिक विद्याशाखांसाठी आवश्यक असलेला पारिभाषिक शब्दसंग्रह हाताशी नव्हता. दुसरे असे की, निरनिराळ्या विद्याशाखां-तील विषय शिकवण्याकरिता आवश्यक असलेली पाठ्यपुस्तके व संदर्भ पुस्तके लिहिली गेली नव्हती. काही विद्यापीठांनी यादृष्टीने प्रयत्न केले परंतु ते त्यांच्यापुरते व मर्यादित स्वरूपात होते. सर्व विद्यापीठांतून समान आणि एकरूप परिभाषा वापरली जावी यासाठी शासनाने पुढाकार घेणे आवश्यक होते.

या सर्व गोष्टींचा सांगोपांग विचार करण्यासाठी ऑक्टोबर १९६७ मध्ये महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांचे कुलगुरु व भाषा सल्लागार मंडळाचे सदस्य यांची एक संयुक्त बैठक शासनातर्फे घेण्यात आली. या बैठकीत भाषा संचालनालयाने विद्यापीठांतून शिकवल्या जाणाऱ्या शास्त्रीय व मानवविद्याविषयक विषयांची परिभाषा महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांच्या सहकार्याने तयार करावी असे ठरले. संदर्भ ग्रंथांच्या व क्रमिक पुस्तकांच्या निर्मितीचे काम महाराष्ट्र राज्य विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळ यांच्याकडे सोपवावे असे ठरले.

वरील निर्णयाच्या अनुरोधाने भाषा संचालनालयाने शास्त्रीय व मानविकी विद्याशाखांतील भौतिक, रसायन, गणित, समाजशास्त्र, वाणिज्य यांसारख्या काही मूलभूत विषयांच्या परिभाषा समित्या प्रथम स्थापन केल्या व काही निदेशक तत्त्वे ठरवून या कामाला सुरुवात केली. या समित्यांवर सर्व विद्यापीठांचे प्रतिनिधी व विज्ञान परिषदेचे प्रतिनिधी, सदस्य म्हणून नेमण्यात आले. परिभाषा निर्मितीचे सुरुवातीचे हे काम अर्थातच कठीण होते. शिवाय, ही परिभाषा केवळ प्रादेशिक स्तरापुरतीच मर्यादित न राहता अन्य भारतीय भाषांनाही ती यथाशक्य स्वीकार्य व्हावी हा दृष्टिकोन ठेवणेही आवश्यक होते. त्यामुळे ही परिभाषा केंद्र सरकारने तयार केलेल्या परिभाषेशी मिळतीजुळती असावी असे धोरण ठरविण्यात आले. या शब्दनिर्मितीकरिता मराठी भाषेत तोपर्यंत तयार झालेल्या इतर शास्त्रीय विषयांवरील शब्द-कोशांचाही उपयोग करण्यात आला.

आतापर्यंत भाषा संचालनालयाने गणित, रसायन, समाज, वाणिज्य, तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र, ग्रंथालय, शारीर, भूशास्त्र, भौतिक, शिक्षण, यंत्र अभियांत्रिकी, स्थापत्य अभियांत्रिकी व विद्युत अभियांत्रिकी या विषयांवरील परिभाषा कोश प्रसिद्ध केले आहेत. तसेच, जीवशास्त्र, अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, धातुशास्त्र, भूगोल, शरीरक्रिया, भाषाशास्त्र व साहित्य समीक्षा या विषयांचे काम पूर्ण झाले असून तेही कोश यथावकाश प्रसिद्ध करण्यात येतील. प्रस्तुत कृषिशास्त्र परिभाषा कोश हा या प्रकल्पातील एक टप्पा आहे.

कृषिशास्त्र परिभाषा निर्मितीचे काम भाषा संचालनालयाने कृषिशास्त्र समिती नेमून हाती घेतले होते. महाराष्ट्रातील कृषि विद्यापीठे व मराठी विज्ञान परिषद यांच्या शिफारशी-नुसार कृषिशास्त्र समिती स्थापन करून भाषा संचालनालयाने कृषिशास्त्र परिभाषा कोशाचे काम हाती घेतले. या समितीच्या एकूण ४३ बैठकी घेण्यात आल्या व सुमारे १०,५०० इंग्रजी पारिभाषिक संज्ञांचे मराठी पर्याय निश्चित करण्यात आले.

डॉ. रा. ज. कळमकर हे प्रस्तुत समितीचे अध्यक्ष होते. त्यांचे २५ एप्रिल १९७४ रोजी अमेरिकेत दुःखद निधन झाले. समितीचे काम त्यांच्या मार्गदर्शनाखाली सुरळीतपणे सुरू झाले होते.

अनेक तज्ज्ञ व मान्यवर व्यक्तींच्या सहकार्याने तयार झालेला हा कोश या क्षेत्रातील प्राध्यापक, लेखक व विद्यार्थी यांना तसेच या विषयाची आस्था असणाऱ्या अन्य व्यक्तींना व सर्व संबंधित शासकीय विभागांना उपयुक्त व मार्गदर्शक ठरेल असा विश्वास वाटतो.

परिभाषेची उपयुक्तता प्रत्यक्ष वापराने सिद्ध होत असल्याने कालांतरानेच तिचे मूल्यमापन होऊ शकेल.

**न. ब. पाटील**
भाषा संचालक,
महाराष्ट्र राज्य

## दोन शब्द

भाषा संचालनालयाने १५ ऑगस्ट १९८३ रोजी "कृषिशास्त्र" परिभाषा कोशाची प्रथम आवृत्ती प्रकाशित केली होती. प्रस्तुत आवृत्तीच्या प्रती लवकरच संपल्यामुळे आता या कोशाचे पुनर्मुद्रण करण्यात आले आहे.

प्रस्तुत विषयाची पाठ्यपुस्तके लिहिताना हा परिभाषा कोश उपयुक्त ठरेल. त्याचप्रमाणे या विषयाचे सुलभपणे आकलन होण्याच्या दृष्टीनेही तो सहायक ठरेल अशी आशा आहे.

[ **प. ग. पाटील** ]
भाषा संचालक,
महाराष्ट्र राज्य.

मुंबई
दिनांक ३ डिसेंबर १९८७.

# शब्दकोशाबद्दल

शेती हा आपल्या देशातील ७० टक्के लोकांचा व्यवसाय आहे. खेड्यातील लोकांचे तर हेच उपजीविकेचे एकमेव साधन आहे. शेतीची भरभराट झाली तर खेड्यात राहणाऱ्यांचे आणि शेतीशी निगडित उद्योगधंद्यात काम करणाऱ्यांचे जीवनमान सुधारेल. शेतीची भरभराट ही संशोधनावर आधारलेल्या आधुनिकीकरणावर अवलंबून आहे. आज कृषिशास्त्र इंग्रजी माध्यमातून शिकविले जाते. त्यामुळे ह्या विषयातील संशोधन-फलितेही इंग्रजी भाषेत तयार होतात. शेतीच्या विकासासाठी आवश्यक असे ज्ञानभांडार इंग्रजी भाषेत आहे. पण ज्यांच्यासाठी हे ज्ञानभांडार निर्माण केले जाते त्या लोकांची मायबोली महाराष्ट्रात मराठी आहे. त्यामुळे शेतीविषयक आधुनिक संशोधन मराठी भाषेत होणे आवश्यक आहे. शिक्षणाचे माध्यम मातृभाषा हे असावे हे मत आता सर्वमान्य झाले आहे. याच धोरणानुसार कृषि विद्यापीठांच्या कायद्यात कृषिशास्त्र शिक्षणाचे माध्यम मराठी असावे असे म्हटले आहे. मराठीत कृषिविषयक पुस्तके नाहीत. महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळाच्या सहाय्याने अशी पुस्तके तयार करण्याची एक योजना माझ्याकडे सोपवण्यात आली होती. या कामासाठी इंग्रजी शब्दांना योग्य असे मराठी शब्द लेखकांना उपलब्ध करून देणे आवश्यक होते. परंतु असे कोश नसल्याचे माझ्या लक्षात आले. भाषा संचालनालयाने या अगोदरच शास्त्रीय व तांत्रिक शब्दावलीचे काम हाती घेतले होते. परंतु कृषिशास्त्राच्या परिभाषा कोशाच्या अशा कामाला १९७१ पर्यंत सुरुवात झाली नव्हती. त्यावर्षी महाराष्ट्रातील सर्व कृषि विद्यापीठातील प्रतिनिधींची एक कृषिशास्त्र परिभाषा समिती नेमण्यात आली. या समितीने हा शब्दकोश आता तयार केला आहे.

हा शब्दकोश करताना इंग्रजी शब्दांचा भावार्थ पर्यायी मराठी शब्दांत आणणे आवश्यक होते. तसेच, कृषिशास्त्र हे व्यावहारिकदृष्ट्या महत्त्वाचे शास्त्र असल्यामुळे व्यवहारात प्रचलित असलेल्या मराठी रूढ शब्दांचाही विचार करणे आवश्यक होते. ह्या शब्दांची माहिती कृषि महाविद्यालयात कार्य करणाऱ्या प्राध्यापकांना कृषि विस्तार शिक्षणाच्या माध्यमातून झाली होती. त्यांच्या ज्ञानाचा फायदा घेण्याच्या उद्देशाने समितीच्या बैठकी निरनिराळ्या कृषि महाविद्यालयांत घेण्यात आल्या. त्यामुळे ह्या शब्दकोशात व्यवहारात रूढ झालेले बरेच शब्द आढळतील. कृषि-विषयक शब्दांचे भांडार वाढवण्याला ह्यामुळे अनायासे हातभार लागला. विषय समजावून घेणेही व्यवहारातील ह्या शब्दांच्या उपयोगामुळे सुलभ झाले. महाराष्ट्राचा विस्तार फार मोठा आहे. दर १२ कोसांवर भाषा बदलत असते. त्यामुळे निरनिराळ्या विभागात एकच वस्तू निरनिराळ्या नावांनी ओळखली जाते. उदा. विदर्भात ज्याला "डवरा" म्हणतात त्यालाच पश्चिम

महाराष्ट्रात "कोळप" म्हणतात. त्यामुळे ह्या शब्दकोशात हे दोनही शब्द एकार्थाचे असे दिले आहेत. कृषिशास्त्राचा संबंध इतर शास्त्रांशी (जसे रसायनशास्त्र, भौतिकशास्त्र, मानसशास्त्र, संख्याशास्त्र इ.) येत असल्यामुळे ह्या शास्त्रांचे जे नवीन पारिभाषिक शब्द तयार झाले त्यांचाही समावेश प्रस्तुतच्या कोशात करण्यात आला आहे. असे करताना पारिभाषिक एकरूपता कटाक्षाने साधण्यात आली आहे.

कृषिशास्त्रातील सर्वच इंग्रजी शब्दांना अगदी योग्य असे पर्यायी शब्द तयार केले आहेत असा प्रस्तुत कृषिशास्त्र परिभाषा समितीचा दावा नाही. या कोशात सुधारणेला अजून बराच वाव आहे हे येथे प्रामाणिकपणे कबूल करावे लागेल. ह्या प्रयत्नामुळे ह्या विषयाला केवळ चालना मिळाली आहे एवढेच. पुढील संस्करणात ह्या शब्दकोशातील दोष कमी होतील आणि कोशाची उपयुक्तता वाढेल या दृष्टीने प्रयत्न करण्यात येतील. यासाठी ह्या शब्दकोशाचा उपयोग करणाऱ्या सर्व ज्ञानवंतांनी हा कोश आणखी परिपूर्ण करण्याच्या दृष्टीने त्यांच्या सूचना काही असल्यास, त्या भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य यांच्या कार्यालयाला पाठवाव्या अशी विनंती आहे.

**कृ. रा. ठाकरे**<br>
कुलगुरु<br>
पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला.

अकोला<br>
१ जुलै १९८३

# भाषा सल्लागार मंडळाने वैज्ञानिक व तांत्रिक परिभाषेच्या निर्मितीसाठी आधारभूत म्हणून ठरवून दिलेली 'निदेशक तत्त्वे'

शास्त्रीय व तांत्रिक परिभाषा निर्मिती करताना केंद्र सरकारने जी तत्त्वे प्रमाणभूत म्हणून स्वीकारली ती सर्वांनाच मान्य होण्यासारखी आहेत. मराठी परिभाषा निर्मितीसाठी हीच तत्त्वे निदेशक तत्त्वे म्हणून स्वीकारण्यात आली आहेत. ती पुढीलप्रमाणे :

१. **शब्दसंग्रह व पर्याय.**—पुणे विद्यापीठ, माध्यमिक शिक्षण मंडळ व इतर विज्ञान संस्था यांनी तयार केलेले शब्दसंग्रह व प्रचलित पर्याय हेही विचारात घ्यावेत.

२. **आंतरराष्ट्रीय संज्ञा.**—'आंतरराष्ट्रीय संज्ञा' या शक्यतोवर त्यांच्या इंग्रजी स्वरूपातच ठेवाव्यात व त्यांचे मराठी भाषेत लिप्यंतरण करावे. आंतरराष्ट्रीय संज्ञांत साधारणतः पुढील गोष्टींचा समावेश होतो:—

(अ) मूलद्रव्ये आणि संयुगे (महत्त्वपूर्ण पदे, उपपदे, वगैरेंसह) यांची नावे. ही नावे लिप्यंतरित करून देताना नावांपुढे त्यांची संकेतचिन्हेसुद्धा द्यावीत.

जसे.—हायड्रोजन (H), कार्बन (C).

मात्र मूलद्रव्ये आणि संयुगे यांसाठी वापरण्यात येणारी संकेतचिन्हे व संक्षेप इंग्रजी लिपीत जसेच्या तसेच ठेवावेत.

जसे.—किरणोत्सारी थोरिअमचा समस्थानीय 90th$^{228}$, निकोटीन $C_{10}H_{14}N_2$.

रासायनिक चिन्हांकित समीकरणे, त्यांची इंग्रजीतील संकेतचिन्हे जशीच्या तशी ठेवून पुढीलप्रमाणे द्यावीत:—




गंधक, रुपे, तांबे, कथील, पारा, जस्त, शिसे, इत्यादी रूढ शब्द वर्णनात तसेच ठेवावेत; परंतु रासायनिक संयुगांची नावे देताना ती त्यांच्या प्रचलित नावांप्रमाणेच द्यावीत.

(ब) वजने, मापे आणि परिमाणे. जसे.—कॅलरी, अॅम्पिअर, वगैरे.

(क) विशेषनामे व त्या नामांवरून घेतलेल्या संज्ञा मूळ भाषेतील त्यांच्या उच्चारानुरूप लिहाव्यात.

जसे.—फॅरनहीट श्रेणी (फॅरनहीट), व्होल्टमीटर (व्होल्टा), अॅम्पिअर (अॅम्पिअर).

(ड) वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, भूशास्त्र इत्यादींसारख्या शास्त्रीय विषयांमधील द्विपद नामसंज्ञा.

(इ) रेडिओ, पेट्रोल, रडार, इलेक्ट्रॉन, न्यूट्रॉन, प्रोटॉन यांसारखे नवीन शब्द.

(फ) गणित व इतर शास्त्रांमध्ये वापरण्यात येणारे संख्यांक, संकेतचिन्हे, सूत्रे, वगैरे.

जसे.—Sin., Cos., Tan., Log.

तथापि, वर निर्दिष्ट केलेल्या पारिभाषिक संज्ञांपैकी पुष्कळशा संज्ञांना मराठीत योग्य पर्याय असून ते शाळा व महाविद्यालये इत्यादींत कित्येक वर्षांपासून रूढ झाले आहेत.

जसे.—ऑक्सिजन–प्राणवायु, कॅलरी–ऊष्मांक, Sin.–ज्या, Cos.–कोज्या, वगैरे.

तेव्हा आंतरराष्ट्रीय संज्ञा त्यांच्या इंग्रजी स्वरूपात जशाच्या तशा लिप्यंतरित करून देताना त्याबरोबरच त्या संज्ञांना मराठीत रूढ असलेले पर्याय देखील द्यावेत.

३. जी संकेतचिन्हे असतील ती त्यांच्या आंतरराष्ट्रीय स्वरूपातच राहू द्यावीत. तथापि, संज्ञांचे संक्षेप देवनागरी लिपीतून दर्शवावेत. "Cm." म्हणजे "सेंटिमीटर" या संज्ञेचा संक्षेप सें. मी. असा देवनागरी लिपीत द्यावा.

४. वैज्ञानिक व तांत्रिक पारिभाषिक शब्दांसाठी पर्यायांची निश्चिती करताना, अर्थाची निश्चितता व सुबोधता यांवर अधिक भर द्यावा व मराठी भाषेच्या प्रकृतीशी अविरोधी असे व शक्यतोवर भारतीय भाषांत वापरता येतील असेच पर्याय निवडावेत.

५. विवक्षित वैज्ञानिक शब्दांसाठी जे देशीय पर्याय मराठी भाषेत प्रचलित आहेत ते आणि सर्वसाधारणपणे वापरण्यात येणारे पर्याय तसेच राहू द्यावेत.

६. विदेशी भाषांमधील जे शब्द मराठी भाषेत प्रचलित आहेत ते तसेच ठेवावेत.

जसे.—मशीन, इंजिन, मीटर, लिटर, वगैरे.

७. हे पर्याय मराठी व्याकरणानुसार प्रातिपदिक रूपात द्यावेत.

८. **मिश्र शब्दांची निर्मिती.**—वैज्ञानिक परिभाषा तयार करताना Pasteurisation "पाश्चरीकरण", Voltage "व्होल्टता" अशांसारखे मिश्र शब्द बनवणे हे भाषेच्या स्वाभाविक प्रवृत्तीस अनुसरून असल्यामुळे गरजेनुसार असे शब्द तयार करावेत.

९. जरूर तेथे समान अर्थी पारिभाषिक शब्दांची कुळे लक्षात घेऊन मराठी पारिभाषिक शब्द निश्चित करावेत.

# कोश परिचय

कोशाची रचना पुढीलप्रमाणे आहे :—

इंग्रजी शब्द व शब्दानुक्रम :—इंग्रजी शब्द देताना मुख्यत्वेकरून Chambers Technical Dictionary व Webster's New International Dictionary यांचा, तसेच या विषयाशी संबंधित असलेल्या अन्य कोशांचा वर्णलेखन (spelling) इत्यादींसाठी आधार घेतला आहे.

इंग्रजी शब्दजाती :—प्रत्येक एकेरी संज्ञेपुढे तिची शब्दजाती दर्शविली आहे. (जसे :—*n.*; *adj.*; *v.t.*; *v.i.* इ.) इंग्रजी दोन किंवा अधिक शब्द असलेल्या संज्ञेपुढे शब्दजाती दर्शविलेली नाही.

विषयनिर्देशक संक्षेप :—एखादी इंग्रजी पारिभाषिक संज्ञा विशिष्ट पोटविषयाशी संबंधित असेल तर पर्याय देण्यापूर्वी तो विवक्षित विषय दर्शविणारा संक्षेप इंग्रजी इटॅलिक मुद्राक्षरात दिला आहे.

पर्याय, अर्थच्छटा, स्पष्टीकरणे :—इंग्रजी संज्ञेपुढे शब्दजाती, विषयनिर्देशक संक्षेप (असल्यास) दिल्यानंतर तिचे एक किंवा अधिक मराठी पर्याय दिले आहेत. पर्याय देताना वेगवेगळ्या अर्थच्छटा असल्यास त्यांना क्रमांक दिले आहेत. काही ठिकाणी अर्थ अधिक स्पष्ट व्हावा म्हणून पर्यायापूर्वी कंसात इंग्रजी स्पष्टीकरण दिले आहे किंवा काही ठिकाणी पर्यायानंतर कंसात मराठी स्पष्टीकरणही दिले आहे. पर्यायांचा वापर यथार्थपणे व्हावा यासाठी आवश्यक तेथे कंसांत, "as in :" असे देऊन त्या पर्यायाचा उपयोग करून दाखवला आहे.

मराठी शब्दजाती :—इंग्रजी संज्ञेपुढे शब्दजाती दर्शविली असल्याने व त्यानुसार मराठी पर्याय घेतला असल्याने मराठी शब्दजाती वेगळी दर्शविली नाही.

लिंगनिर्देश :—(१) प्रत्येक मराठी एकेरी पर्यायापुढे तो नाम असल्यास लिंगनिर्देश केला आहे. (२) इंग्रजी संज्ञा एकेरी असल्यास तिच्या जोडशब्द असलेल्या मराठी पर्यायापुढे लिंगनिर्देश केला आहे. (३) इंग्रजी अनेकवचनी जोडशब्दाच्या मराठी पर्यायापुढेही लिंगनिर्देश केला आहे.

शब्दकुळे :—शब्दकुळांतील शब्दांची आधारभूत कल्पना एकच असते, परंतु त्यांतील शब्द सूक्ष्म अर्थच्छटा व्यक्त करून आपली भिन्नता दर्शवितात. असे शब्द त्यातल्या महत्त्वाच्या शब्दाखाली पर्यायानंतर *cf.* असे दर्शवून एकत्रितपणे दिले आहेत. तसेच त्या शब्दकुळातील शब्द, कोशात त्यांच्या वर्णक्रमानुसार योग्य त्या ठिकाणी दिले आहेत व तेथे *cf.* असे म्हणून ज्या इंग्रजी संज्ञेखाली हे कूळ आले आहे त्या इंग्रजी संज्ञेचा निर्देश केला आहे. उदा. पृ. १८ वरील boulder हे कूळ पहावे. अशा तऱ्हेने शब्दकुळाखाली सर्व शब्द एकत्र आगण्याच्या या पद्धतीचा अभ्यासकांना उपयोग होऊ शकेल.

जोडसंज्ञा :—काही महत्त्वाच्या पारिभाषिक जोडसंज्ञांखाली या संज्ञांतील इतर महत्त्वाचे प्रकार दर्शविणाऱ्या संज्ञा एकत्र आणल्या आहेत. उदा. पृ. १५ वरील bean ही संज्ञा पहावी. याही पद्धतीचा अभ्यासकांना उपयोग होऊ शकेल.

समानार्थी शब्द :—काही इंग्रजी शब्द जवळजवळ समानार्थी असल्याने त्यांना मराठी पर्याय देताना हे शब्द समानार्थी आहेत हे दर्शविण्यासाठी एकाच ठिकाणी दिले आहेत. ज्या शब्दासमोर पर्याय दिला आहे त्या शब्दासमोर कंसात (*also*) असे देऊन दुसरा समानार्थी शब्द दर्शविला आहे व कंसातील शब्द त्याच्या वर्णक्रमानुसार ज्या ठिकाणी आला असेल त्या ठिकाणी त्या शब्दासमोर = अशी खूण दर्शवून पर्याय ज्या शब्दासमोर दिला आहे तो शब्द दर्शविला आहे. त्याचप्रमाणे इंग्रजी शब्दाच्या वर्णलेखनात (spelling) थोडा फेरफार असलेले इंग्रजी शब्दही वरील पद्धतीनेच दर्शविण्यात आले आहेत.

# संक्षेप सूची

| | | |
|---|---|---|
| *adj.* | .. | adjective |
| *Ag. Eng.* | .. | Agricultural Engineering |
| *Agric.* | .. | Agriculture |
| *A. H.* | .. | Animal Husbandry |
| *Anat.* | .. | Anatomy |
| *Bot.* | .. | Botany |
| *Carp.* | .. | Carpentry |
| *Chem.* | .. | Chemistry |
| *cf.* | .. | compare |
| *Cyt.* | .. | Cytology |
| *Econ.* | .. | Economics |
| *Gen.* | .. | Genetics |
| *Geog.* | .. | Geography |
| *Geol.* | .. | Geology |
| *Hort.* | .. | Horticulture |
| *Math.* | .. | Mathematics |
| *Med.* | .. | Medicine |
| *Min.* | .. | Mineral |
| *n.* | .. | noun |
| *Pathol.* | .. | Pathology |
| *Phys.* | .. | Physics |
| *Physiol.* | .. | Physiology |
| *pl.* | .. | plural |
| *sing.* | .. | singular |
| *Vet.* | .. | Veterinary |
| *v.i.* | .. | verb, intransitive |
| *v.t.* | .. | verb, transitive |
| *v.t. & i.* | .. | verb, transitive and intransitive |
| *Zool.* | .. | Zoology |
| अ.व. | .. | अनेकवचन |
| न. | .. | नपुंसकलिंग |
| पु. | .. | पुल्लिग |
| सा. | .. | सामान्य लिंग |
| स्त्री. | .. | स्त्रीलिंग |

# कृषिशास्त्र परिभाषा कोश

# A

abdomen, *n.* उदर (न.)
abdominal viscera, उदर आंतर अंगे
Ablemosechus Esculentus, *Bot.* (lady's finger) अॅब्लेमोसेचस् एस्क्युलेंटस् (भेंडी)
Ablemosechus Manibot, *Bot.* अॅब्लेमोसेचस् मॅनिबॉट (रानभेंडी)
abnormality, *n.* अपसामान्यता (स्त्री.), अस्वाभाविकता (स्त्री.)
abnormal milk, अस्वाभाविक दूध
abnormal presentation, अपसामान्य गर्भ-प्रस्तुति
abolition of zamindari, जमीनदारी उन्मूलन
abomasum, *n.* जठरिका (स्त्री.)
abortion, *n.* १ गर्भपात (पु.) २ अपूर्णविकसन (न.)
abrasion, *n.* अपघर्षण (न.)
abscess, *n. Med., Zool.* विद्रधि (पु.), गळू (न.)
abscess knife, गळू कापण्याचा चाकू
abscond, *v.i.* उडून जाणे
absentee landlord, अन्यत्रवासी क्षेत्रस्वामी
Absidia Glauca, अब्सीडिआ ग्लॉका
absolute, *adj.* निरपेक्ष, केवल
absolute deviation, निरपेक्ष विचलन
absolute frequency, केवल वारंवारता
absolute measure of dispersion, केवल अप-स्करण माप
absolute population, पूर्ण गणसंख्या
absorbing complex, अवशोषी संमिश्र
absorption, *n.* १ शोषण (न.) २ अवशोषण (न.)
absorption loss, अवशोषण हानि
absorption of nutrients, पोषकद्रव्यांचे शोषण
absorptive, *adj.* अवशोषी
abstract, *n.* सारांश (पु.), सार (न.)
Acacia arabica, *Bot.* (babul or gum tree) अॅकेशिआ अरेबिका (बाभूळ)
Acacia catechu, *Bot.* अॅकेशिआ कॅटेच्यु (खैर)
Acanthiophilus helienthi, अॅकेन्थिओफिलस हेलिअेन्थी
acaricide, *n.* वरूथिनाशक (न.)
accelerated erosion, त्वरणित धूप, त्वरणित झीज
accelerator, *n.* (*also* activator) १ त्वरणित्र (न.) २ त्वरक (पु.)
accessory, *adj.* सहायक
accessory organ, सहायक अंग
acclimatization, *n.* पर्यनुकूलन (न.)
acclimatized variety, पर्यनुकूलित वाण, पर्यनुकूलित जात
accumulation of salt, १ क्षार संचय २ लवण संचय
acentric, *adj.* अकेंद्री, अकेंद्र–
acervulus, *n. Bot.* अॅसरव्हुलस (पु.)
acetabulum, *n. Zool.* उलूखल (न.), उखळ (न.)
acetic acid, *Chem.* अॅसेटिक आम्ल
acetoin, *n. Chem.* अॅसीटॉइन (न.)
acetonaemia, *n.* अॅसीटोनेमिआ (पु.), आम्ल-रक्तता (स्त्री.)
acetone, *n. Chem.* अॅसीटोन (न.)
Achaea janata, १ (castor semi-looper) अॅकिआ जॅनेटा (एरंड अर्धवलयी अळी) २ (fruit sucking moth) अॅकिआ जॅनेटा (फल-शोषी पतंग)
Achromobacter radiobacter, अॅक्रोमोबॅक्टर रेडिओबॅक्टर

acid, *n. Chem.* आम्ल (न.)
acid clay, अधिसिलिक चिक्कणमाती, अधिसिलिक माती
acidic, *adj. Chem.* आम्लधर्मी
acidic anhydride, ॲसिडिक ॲनहायड्राइड
acidic rock, अधिसिलिक खडक
acidic soil, आम्लधर्मी मृदा
acidimeter, *n. Chem.* आम्लमापी (पु.)
acidity, *n.* आम्लता (स्त्री.)
acidity test, आम्लता चाचणी
acidoid, *n.* मृदा आम्ल (न.)
acidosis, *n.* रक्त आम्लता (स्त्री.)
acid soil, आम्ल मृदा
acid value, आम्लांक (पु.), आम्लमान (न.)
acinus, *n.* (alveolus) कोष्ठक (न.)
acme harrow, ॲक्मी वखर, ॲक्मी कुळव
acquired character, *Bot., Zool.* उपार्जित लक्षण, उपार्जित वैशिष्टय, संपादित लक्षण, संपादित गुणधर्म
acquired immunity, उपार्जित प्रतिक्षमता
acquisition, *n.* संपादन (न.)
Acrasia, *n.* (*also* Acrasiale) अक्रेशिआ (पु.)
acre, *n.* एकर (पु.)
acreage, *n.* एकूण एकर (पु.अ.व.), एकरी क्षेत्रफळ (न.)
acre-foot, *n.* एकर-फूट (पु.)
acre-inch, *n.* एकर-इंच (पु.)
acre value, एकर मूल्य
actinomycosis, *n. Bot., Zool.* ॲक्टीनोमायकॉसिस (पु.)
action, *n.* क्रिया (स्त्री.)
activated charcoal, सक्रियित लोणारी कोळसा
activated sludge, १ *Agric.* सक्रियित अवपंक २ (sewage) सक्रियित अवमळ
activation, *n.* सक्रियण (न.)
activator = accelerator
active *adj.* सक्रिय, क्रियाशील, क्रियाप्रवण
active acidity, सक्रिय आम्लता
active congestion of the brain, अधिकजन्य मस्तिष्क रक्त संकुलन
active ingradient, सक्रिय घटकद्रव्य
acute, *adj.* १ तीक्ष्ण २ तीव्र
adaptability, *n.* अनुकूलनक्षमता (स्त्री.), अनुकूलनीयता (स्त्री.)
adaptation, *n.* अनुकूलन (न.)
additive, *adj.* समावेशी
additive effect, समावेशी प्रभाव
adenose, *adj. Bot.* ग्रंथिल
adequate, *adj.* पर्याप्त, पुरेसा
adhere, *v.t.* आसंजित होणे
adhering, *adj.* आसंजी
adhesion, *n.* आसंजन (न.)
adhesive, *adj.* आसंजक, आसंजनशील
adhesiveness, *n.* आसंजकता (स्त्री.)
adhesive plaster, आसंजनशील पलिस्तर, आसंजनशील गिलावा
adiabatic, *adj.* समोष्ण
adjustable hitch, समायोज्य खटका
adjusted, *adj.* समायोजित
adjusted price, समायोजित मूल्य, समायोजित किंमत
adjuster butter, (*also* adjustor butter) समायोजक बटर
adjustment, *n.* समायोजन (न.)
adjustor butter = adjuster butter
administer, *v.t.* देणे
administration, *n.* प्रशासन (न.)
admixture, *n.* अधिमिश्रण (न.)
adobe, *n. Geol.* अडोब (न.)
adopt, *v.t.* अंगीकार करणे
adoption, *n.* अंगीकार (पु.)
adrenal gland, *Zool.* अधिवृक्क ग्रंथि
adrenalin, *n. Zool.* अधिवृक्क स्राव (पु.)
adsorbate, *n.* अधिशोषित (न.)
adsorbent, *n.* अधिशोषी (पु.), अधिशोषक (पु.)

adsorption, *n.* अधिशोषण (न.)
adsorption potential, अधिशोषण विभव
adulterant, *n.* अपमिश्र (न.)
adulterated milk, अपमिश्रित दूध, भेसळ केलेले दूध
adulteration, *n.* अपमिश्रण (न.), भेसळ (स्त्री.)
ad valorem duty, मूल्यानुसार शुल्क
adventitious root, अपस्थानिक मूळ
adverse effect, प्रतिकूल परिणाम
adze, *n. Carp.* वासला (पु.)
aecidiospore, *n. Bot.* एसिडिओबीजाणु (पु.)
aecidium = aecium, *n.* एसिडिअम (न.), एसिअम (न.)
Aegle marmelos, *Bot.* बेलफळ (न.)
aeolian deposit, वातवाहित निक्षेप, वातोढ निक्षेप
aeolian soil, वातवाहित मृदा, वातोढ मृदा
aeration, *n.* वातन (न.)
aeration pore, वातन रंध्र
aerial, *adj.* वायवीय, हवाई
aerial growth, वायवीय वृद्धि
aerial layering = air layering, गुटी कलम बांधणे
aerial root, *Bot.* वायवीय मूळ
aerial stem, वायवीय स्तंभ
Aerobacter, *n.* एरोबॅक्टर (न.)
Aerobacter aerogenes, एरोबॅक्टर एरोजिनेज
aerobe=aerobiont, *n.Biol.* ऑक्सिजीव (पु.), वायुजीव (पु.)
aerobic, *adj.* ऑक्सि–, ऑक्सीय, वातापेक्षी
aerobic bacteria, ऑक्सि जीवाणु, वातापेक्षी जीवाणु
aerobic decomposition, ऑक्सि अपघटन
aerobic nitrogen-fixing bacterial, नत्रस्थिर-कारी ऑक्सि जीवाणु
aerobiont = aerobe
aerometer, *n.* एरोमीटर (पु.), वायुघनत्वमापी (पु.)

aerosol, *n. Chem.* एरोसॉल (पु.)
aesthesiology, *n.* ज्ञानेंद्रिय विज्ञान (न.)
aetiology, *n.* हेतुविद्या (स्त्री.), कारणचिकित्सा (स्त्री.)
affinity, *n.* आसक्ति (स्त्री.)
afflux, *n.* चढाव (पु.), लोंढा (पु.)
afflux bund, चढाव बांध
afforest, *v.t.* वनरोपण करणे
afforestation, *n.* वनरोपण (न.), वननिर्मिति (स्त्री.)
after-birth, *n. Bot.* अपराकला (स्त्री.), वार (स्त्री.)
aftercrop, *n.* दुबार पीक (न.)
aftergrass, *n.* खोडवा गवत (न.)
aftergrowth, *n.* पुनर्वृद्धि (स्त्री.)
Agaricus nebularis, ॲगॅरिकस नेबुलॅरिस
agar plate method, आगर प्लेट पद्धति
age composition, वय संघटन
age distribution, वयानुसार विभागणी
age-group, *n.* वय गट (पु.)
agglutination, *n.* प्रातंचन (न.)
aggregant, *n.* समुच्चयी (पु.)
aggregate fruit, पुंजफल (न.)
aggregate structure, समुच्चय संरचना
aggregation, *n.* १ समुच्चयन (न.) २ समुच्चय (पु.)
Agmark, *n.* ॲगमार्क (पु.)
Agonoscelis nubila, (flower head-bug) ॲगोनोसेलिस नूबिला (पुष्पशीर्ष ढकणी)
agrarian, *n.* क्षेत्रिक (पु.)
*adj.* कृषिभूमि–
agrarian revolution, कृषिभूमि क्रांति
Agresco, *n.* ॲग्रेस्को (पु.)
agricultural, *adj.* कृषि–, कृषिसंबंधी
agricultural account, कृषि लेखा
Agricultural Commission, कृषि आयोग
agricultural credit, १ कृषि पत २ कृषि पतपैसा
agricultural credit society, कृषि पतसंस्था

agricultural depression, कृषि मंदी
agricultural development, कृषि विकास
agricultural economics, (*also* farm economics) कृषि अर्थशास्त्र, शेती अर्थशास्त्र
agricultural economics and statistics, कृषि अर्थशास्त्र आणि सांख्यिकी
agricultural economy, कृषि अर्थव्यवस्था
agricultural engineer, कृषि अभियंता
agricultural engineering, कृषि अभियांत्रिकी
agricultural extension, कृषि विस्तार
agricultural fair, कृषि मेळावा
agricultural forecasting, कृषि पूर्वानुमान
agricultural geology, कृषि भूशास्त्र
agricultural improvement, कृषि सुधार
agricultural income, कृषि आय
agricultural labour, १ कृषि श्रम २ कृषि श्रमिक, शेतमजूर
agricultural law, कृषि विधि
Agricultural Loans Act, कृषि कर्ज अधिनियम
agricultural machinery=farm machinery
agricultural marketing, कृषि विपणन
agricultural market report, कृषि विपणन प्रतिवेदन
agricultural operation, शेतकाम (न.)
agricultural policy, कृषि धोरण
agricultural produce=agricultural product, कृषि उपज, कृषि वस्तू
agricultural profit, कृषि नफा, कृषि लाभ
agricultural revolution, कृषि क्रांति
agricultural society, कृषि संस्था
agricultural year, कृषि वर्ष
agriculture, *n.* १ शेतीशास्त्र (न.) २ कृषिशास्त्र (न.)
agriculturist, *n.* १ कृषक (पु.), शेतकरी (पु.) २ कृषिविज्ञ (पु.)
Agrobacter, *n.* अॅग्रोबॅक्टर (पु.)
agro-industry, *n.* कृषि उद्योग (पु.)
agrology, *n.* सस्यमृदविद्या (स्त्री.)
Agromyza Obtusa, (tur pod fly) अॅग्रोमायझा ऑब्टयूसा (तुरीची शेंग माशी)
Agromyza Phaseoli, (cowpea stem fly) अॅग्रोमायझा फॅजिओली (चवळीची खोड माशी)
agronomical, *adj.* १ पिकासंबंधी २ कृषिविद्याविषयक
agronomist, *n.* कृषिविद (पु.)
agronomy, *n.* कृषिविद्या (स्त्री.)
agrostology, *n.* तृणविद्या (स्त्री.)
Agrotis flammatra, (cut worm) अॅग्रॉटिस फ्लॅमेट्रा (कातरकिडा)
Agrotis spinifera, अॅग्रॉटिस स्पाइनीफेरा
Agrotis ypsilon, अॅग्रॉटिस इप्सिलॉन
A-hoe blade, A डवऱ्याची पास, A कोळप्याची पास
air, *n.* हवा (स्त्री.), वात (पु.), वायु (पु.)
air blast, वात झोत
air capacity (of soil), (मृदेची) वात धारकता
air cavity, वात गुहिका
air chamber, वात कक्ष
air choke=air shutter
air cleaner, वात शोधित्र
air compressor, वायु संपीडक
air cooler, वायु शीतक, हवा शीतक, कूलर (पु.)
air-dry, *adj.* वात-शुष्क
air layering=aerial layering
air oven, गरम वायु पेटी, एअर ओव्हन
air pouch, वात कोष्ठ
air shutter=air choke, वातरोधी (पु.), वातढापणी (स्त्री.), चोक (पु.)
albication, *n.* रंजनहीनता (स्त्री.)
albinism, *n.* वर्णहीनता (स्त्री.)
albino, *n.* वर्णहीन (सा.)
albite, *n.* अल्बाइट (न.)
Albugo (Cystopus) Candida, अॅल्बुगो (सिस्टोपस) कॅंडिडा
albuminoid, *n.* अॅल्ब्युमिनॉइड (न.), श्वितिक (न.)

*adj.* ॲल्ब्युमिनयुक्त, श्वितिक
**albuminoid ratio,** ॲल्ब्युमिनॉईड गुणोत्तर
**albuminous,** *adj.* भ्रूण पोषी
**Alcides mali,** (apple shoot borer) आल्सिडीस माळी (सफरचंदावरील शेंडा पोखर, सफरचंदावरील प्ररोह पोखर)
**alcoholic fermentation,** अल्कोहोली किण्वन
**Aleurocanthus spiniferus,** (citrus white fly) अल्युरोकँथस स्पाइनीफेरस (लिंबवर्गीय झाडावरील पांढरी माशी)
**Aleurolobus barodensis,** (sugarcane white fly) ॲल्यूरोलोबस बॅरोडेनसिस (उसावरील पांढरी माशी)
**alfalfa** (lucerne), *n.* अल्फाल्फा (पु.), लसूण गवत (न.)
**alga,** *n.* अल्गा (पु.), शैवाल (न.)
**Algae,** *n. pl.* १ (as, a group) अल्जी (न.), शैवाल (न.) २ (*n. pl.* as, alga) शैवाले (न.अ.व.)
**algal crust,** शैवाल पापडी
**alienee,** *n.* अन्यीकृती (सा.)
**aliener,** *n.* अन्यीकर्ता (पु.)
**alignment,** *n.* १ संरेखन (न.) २ एकरेखन (न.)
**alimentary canal,** अन्ननलिका (स्त्री.)
**alimentary system,** पचनसंस्था (स्त्री.)
**alkaline,** *adj.* अल्कधर्मी
**alkaline soil,** अल्कधर्मी मृदा
**alkalinity,** *n.* अल्कधर्मिता (स्त्री.)
**alkalisation,** *n.* अल्कन (न.)
**alkali soil,** अल्क मृदा
**alkaloid,** *n. Chem.* अल्कलॉइड (न.), अल्काभ (पु.)
**alkalosis,** *n.* रक्त अल्कता (स्त्री.)
**allele = allelomorph,** *n.* युग्मविकल्पी (पु.)
**alley,** *n.* वीथि (स्त्री.)
**Allium,** *n.* ॲलिअम (पु.)
**allogamy,** *n.* परयुग्मन (न.)
**allolactose,** *n.* ॲलोलॅक्टोज (पु.)
**allopolyploid,** *adj.* परबहुगुणित
**allotropy,** *n.* अपरूपता (स्त्री.)
**alloy,** *n.* संमिश्र धातु (पु.), संमिश्र (न.)
**all purpose tractor,** सर्वोपयोगी कर्षित्र
**alluvial soil,** जलोढ मृदा
**almond,** *n.* बदाम (पु.)
**Alocasia Indica,** ॲलोकेशिआ इंडिका (अळू)
**aloes,** *n.* कोरफड (स्त्री.)
**Alternaria,** *n.* आल्टर्नेरिआ (पु.)
**Alternaria brassicae,** १ (blight of crucifers) आल्टर्नेरिआ ब्रेसिकी (कोबीवर्गीयावरील अंगक्षय) २ (leaf spot of cluster beans) आल्टर्नेरिआ ब्रेसिकी (वाज्यावरील पानचट्टे) ३ (pod blight of mustard, pod blight of duan) आल्टर्नेरिआ ब्रेसिकी (मोहरीवरील अंगक्षय)
**Alternaria carthami,** (alternaria disease of safflower) आल्टर्नेरिआ कार्थमी (करडईवरील आल्टर्नेरिआ)
**Alternaria lini,** (alternaria blight of linseed) आल्टर्नेरिआ लिनी (जवसावरील आल्टर्नेरिआ)
**alternation,** *n.* एकांतरण (न.)
**alternative,** *adj.* वैकल्पिक
*n.* विकल्प (पु.)
**altitude,** *n.* १ उंची (स्त्री.) २ उन्नतांश (पु.)
**alum,** *n.* तुरटी (स्त्री.)
**aluminium,** *n.* ॲल्युमिनिअम (न.)
**alveoli,** *n.* ॲल्व्हिओलाय (पु.)
**alveolus,** *n.* (acinus) कोटर (न.)
**Alyricarpus regesus,** ॲलिरीकार्पस रिजेसस, शेवरा (पु.)
**Amanita ovoidea,** ॲमॅनिटा ओव्हॉयडिया
**Amanita virosa,** ॲमॅनिटा व्हायरोसा
**Amaranthus,** *n.* (Amarantus) ॲमॅरॅन्थस (पु.)
**Amaranthus paniculatus,** ॲमॅरॅन्थस पॅनिक्युलॅटस (राजगिरा)

**Amaranthus spinosus,** (prickly amaranthus) ॲमॅरॅन्थस स्पायनोसस
**ambient temperature,** पर्यावरणी तपमान
**ameliorant,** *n.* समुन्नयी (न.)
**amelioration,** *n.* १ सुधार (पु.) २ समुन्नयन (न.) (as in: soil amelioration भूमि समुन्नयन)
**amicron,** *n.* ॲमिक्रॉन (पु.)
**amidase,** *n.* ॲमायडेज (पु.)
**amide,** *n.* ॲमाइड (पु.)
**amination,** *n.* अमिनीकरण (न.)
**aminization,** *n.* ॲमिनायझेशन (न.), ॲमाइनीकरण (न.), ॲमाइनीभवन (न)
**amino acid,** ॲमिनो आम्ल
**amitosis,** *n.* असूत्री विभाजन (न.)
**ammonia,** *n.* अमोनिआ (पु.)
**ammoniated superphosphate,** ॲमोनिआयुक्त सुपरफॉस्फेट
**ammonification,** *n.* अमोनीकरण (न.)
**ammonifier,** *n.* अमोनीकरणित्र (न.)
**ammonium acetate,** अमोनिअम ॲसिटेट
**ammonium carbonate,** अमोनिअम कार्बोनेट
**ammonium chloride,** अमोनिअम क्लोराइड
**ammonium citrate,** अमोनिअम सायट्रेट
**ammonium nitrate,** अमोनिअम नायट्रेट
**ammonium phosphate,** अमोनिअम फॉस्फेट
**ammonium sulphate,** अमोनिअम सल्फेट
**amoeba,** *n.* अमीबा (पु.)
**Amorphophallus companulatus,** (elephant's foot) ॲमॉर्फोफॅलस कंपॅन्युलॅटस (सुरण)
**amorphous,** *adj.* अस्फटिकी
**amorphous constituent,** अस्फटिकी घटक
**amortized loan,** व्यवस्थित शोध ऋण
**amphibole,** *n.* ॲंफिबोल (पु.)
**amphidiploid,** *adj.* उभय द्विगुणित
**ampholyte,** *n.* उभयधर्मी विद्युत अपघटनी
**amphoteric,** *adj.* उभयधर्मी, आम्ल-अल्कधर्मी
**amphoteric behaviour,** आम्ल-अल्कधर्मी वागणूक, उभयधर्मी वागणूक
**ampoule,** *n.* संपुटक (न.)
**amputation,** *n.* अवच्छेदन (न.)
**Amsacta albistriga,** (kutra) ॲम्सेक्टा ॲल्बिस्ट्रायगा (कुतरा)
**Amsacta moorei,** (red hairy caterpillar) ॲम्सेक्टा मूरी (लाल केसाळ सुरवंट)
**A. Murieatus,** (khus) वाळा (पु.)
**amylase,** *n.* अमायलेज (न.)
**amyloplastid,** *n.* ॲमायलोप्लास्टिड (न.)
**amylopsin,** *n.* अमायलॉप्सिन (न.)
**Anabaena,** *n.* ॲनाबीना (स्त्री.)
**anaerobic,** *adj.* विनॉक्सी, विनॉक्सीय
**anaerobic bacteria,** विनॉक्सी जीवाणु
**anaerobic decomposition,** विनॉक्सी अपघटन
**anaesthesia,** *n.* १ बधिरावस्था (स्त्री.) २ बधिरीकरण (न.)
**anaesthetic,** *adj.* बधिरक
**Anagallis arvensis,** (blue pimpernel) ॲनॅगॅलिस आर्वेन्सिस (कृष्णनील)
**anal,** *adj.* गुदविषयक
**analgesic,** *adj.* वेदनाहर, पीडाहारी
**analogous,** *adj.* समधर्मी, समवृत्ति
**analogy,** *n.* सदृशता (स्त्री.), सादृश्य (न.)
**analysis,** *n.* विश्लेषण (न.)
**analysis of covariance,** सहचलन विश्लेषण
**analysis of data,** आधारसामग्रीचे विश्लेषण
**analysis of variance,** प्रसरण विश्लेषण
**Ananas sativus,** (pineapple) ॲननस सटायव्हस (अननस)
**anaphase,** *n.* अनाफेज (स्त्री.), पश्चावस्था (स्त्री.)
**anatomical,** *adj.* शारीर–
**anatomy,** *n.* शारीर (न.), शरीररचनाशास्त्र (न.)
**ancesterological tree,** (*also* genealogical tree) १ वंशवृक्ष (पु.) २ जीन वंशवृक्ष

ancillary data, आनुषंगिक आधारसामग्री
androecium, *n.* पुमंग (न.)
androgenesis, *n.* पुंजनन (न.)
Andropogon centratus, (lemon grass) अँड्रोपोगॉन सेंट्राटस (गवती चहा)
anemometer, *n.* पवनमापी (पु.)
aneuploid, *adj.* असमगुणित
angiology, *n.* रक्तसंचार विज्ञान (न.)
angiosperm, *n.* अँजिओस्पर्म (पु.)
Anguillulina tritici, (ear cockle disease of wheat) अँगुलुलीना ट्रिटिसाय
angular arrangement, कोनीय रचना, कोनीय विन्यास
angular contact ball bearing, कोनीय स्पर्श बॉल बेअरींग, कोनीय स्पर्श गोलक धारवा
anhydrous, *adj.* निर्जल
anicut, *n.* (*also* annicut) अॅनिकट बंधारा (पु.)
animal, *n.* प्राणि (पु.), पशु (पु.)
animal breeding, पशु पैदास
animal carcass, पशुशव (न.)
animal disease, पशुरोग (पु.)
animal husbandry, पशुसंवर्धन (न.)
Animal Husbandry Commissioner, पशुसंवर्धन आयुक्त
animal nutrition, पशुपोषण (न.)
animal refuse, गुरांचे उच्छिष्ट
animal tankage, पशु गर्तावशेष
animal unit, पशु एकक
anion, *n.* अॅनायन (पु.)
anion exchange, अॅनायन विनिमय
anion holding power (of soil), अॅनायन धारकशक्ति
anise, *n.* शोप (स्त्री.), शतपुष्पा (स्त्री.)
aniseed, *n.* शतपुष्पाबीज (न.)
ankylosis, *n.* संधिग्रह (पु.)
annatto, *n.* अॅनाटो (पु.)
annealing, *n.* अनुशीतन करणे (न.)
annexed budget, जोडलेला अर्थसंकल्प
annicut = anicut
Annona, *n.* अॅनोना (न.)
Annona cherimola (cherimolia), अॅनोना चेरीमोला
Annona diversifolia, अॅनोना डायव्हर्सीफोलिया
Annona glabra, अॅनोना ग्लॅब्रा
Annona muricata, अॅनोना म्युरीकेटा
Annona reticulata, अॅनोना रेटिक्युलेटा
Annona squamosa, अॅनोना स्कॉमोझा
annual, *adj.* १ वार्षिक २ वर्षजीवी
annual ring, वार्षिक वलय
annual shoot, वार्षिक प्ररोह
annual yield, वार्षिक उत्पन्न
annuity bond, वार्षिकी बंधपत्र
anode, *n.* अॅनोड (पु.)
anodyne, *adj.* पीडाहर
Anomala dimidiata, (white grub) अॅनोमला डिमिडिएटा (निव्वळ हुमणी)
Anomala polita, (apple leaf and fruit eating beetle) अॅनोमला पॉलिटा (सफरचंदावरील भुंगेरा)
Anomala rugosa, (white grub) अॅनोमला रूगोसा (निव्वळ हुमणी)
anomaly, *n.* असंगति (स्त्री.), असंगतता (स्त्री.)
Anomis sabulifera, (jute semi-looper) अॅनॉमिस सॅब्युलिफेरा (तागावरील अर्धबाकदार अळी)
anorthite, *n.* अॅनॉर्थाइट (न.)
ant, *n.* मुंगी (स्त्री.)
antacid, *adj.* आम्लहर
antagonism, *n.* विरोधभाव (पु.), विरोध (पु.)
antagonistic fungi, विरोधी कवक
antenna, *n.* स्पृशा (स्त्री.), शृंगिका (स्त्री.)
anterior, *adj.* अग्र, पुरस्थ
anterior presentation, अग्र गर्भप्रस्तुति, अग्र गर्भप्रस्तुति

anthelmintic, *adj.* कृमिघ्न
anther, *n.* परागकोश (पु.)
anther lobe, परागकोश खंड
anthesis, *n.* प्रफुल्लन (न.), फुलणे (न.)
ant hill earth, वारूळाची माती
anthocyanidin, *n.* अँथोसायनिडिन (न.)
anthocyanin, *n.* अँथोसायानिन (न.)
anthracnose, *n.* क्षतादिरोग (पु.)
anthrax, *n.* अँथ्रॅक्स (पु.)
anthropic soil, (artificial soil) कृत्रिम मृदा
antibiosis, *n.* प्रतिजीविता (स्त्री.)
antibiotic, *adj.* प्रतिजैविक, प्रतिजीवीय
anticyclone, *n.* प्रतिचक्रवात (पु.)
antidote, *n.* विषघ्न (पु.), उतारा (पु.)
antifriction bearing, घर्षणरोधी धारवा
Antigastra catalaunalis, (sesame brown moth) अँटिगॅस्ट्रा कॅटेल्युनॅलिस (तिळावरील तपकिरी पतंग)
antimony electrode, अँटिमनी इलेक्ट्रोड
antiphlogistic, *adj.* शोथहारी
antiphlogistine, *n.* शोथहर (पु.)
antipyretic, *adj.* ज्वरनाशी, ज्वररोधी
antiquity, *n.* १ प्राचीनता (स्त्री.), पुरातत्त्व (न.) २ प्राचीनकाळ (पु.)
antiseptic, *adj.* प्रतिपूतिक
antiserum, *n.* प्रतिसीरम (न.)
antispasmodic, *adj.* अंगग्रहनाशी
antitetanic serum, धनुर्वातनाशी लस
antitoxic serum, जीवविषरोधक लस
antitoxin, *n.* जीवविषरोधक (न.)
antivitamin, *n.* प्रतिव्हिटॅमिन (न.)
Anuraphis helichrysi, अॅन्युरॅफिस हेलिक्रायसी
anus, *n.* गुदद्वार (न.)
anvil, *n.* ऐरण (स्त्री.)
Aonidiella orientalis, एओनिडिला ओरिअॅटॅलिस
aorta, *n.* महाधमनी (स्त्री.)
apatite, *n.* अॅपेटेट (न.)
apex, *n.* १ अग्र (न.) २ शिखाग्र (न.)
apex bank, शिखर बँक
Aphanomyces laevis, अॅफॅनोमायसीज लीविस
Aphelenchus oleristus, अॅफेलेंकस ओलेरिस्टस
Aphelinus mali, अॅफीलिनस माली
aphis, *n.* मावा (पु.)
Aphis craceivora, (bean aphis) अॅफीस क्रॅसीव्होरा (शेंगेवरील मावा)
Aphis gossypii, (cotton aphis) अॅफीस गॉसीपी (कापसावरील मावा)
apiary, *n.* मधुवाटिका (स्त्री.)
apical growth, अग्रवृद्धि (स्त्री.)
apiculture = bee keeping
apiculturist, *n.* मधुपाल (पु.)
Apion corchori, अॅपियान कार्कोराय
apogamic seedling, अयुग्मकी रोप
apogamy, *n.* अयुग्मकता (स्त्री.)
apomixis, *n.* असंगजनन (न.)
apomorphine hydrochloride, अॅपोमॉर्फिन हायड्रोक्लोराइड
apoplexy, *n.* रक्ताघात (पु.)
apospory, *n.* अबीजाणुता (स्त्री.)
apparatus, *n.* उपकरण संच (पु.)
apparent digestibility, आभासी पचनीयता
apparent specific gravity, आभासी विशिष्ट गुरुत्व
appendage, *n.* उपांग (न.)
appendix, *n.* १ परिशिष्ट (न.) २ आंत्रपुच्छ (न.)
appetite, *n.* भूक (स्त्री.)
apple, *n.* सफरचंद (न.)
apple fruit weevil, सफरचंदावरील सोंडा
apple scab, सफरचंदावरील चट्टा रोग
appliance, *n.* १ उपयंत्र (न.) २ (device) साधन (न.) ३ (as, instrument) साधित्र (न.)
applied economics, उपयोजित अर्थशास्त्र, व्यावहारिक अर्थशास्त्र

applied statistics, उपयोजित सांख्यिकी
appraisal, *n.* मूल्यन (न.)
appraised value, आगणित मूल्य
appreciation, *n.* अधिमूल्यन (न.)
approach road, पोचमार्ग (पु.)
appropriate, *v.t.* विनियोग करणे, विनियोजन करणे
*adj.* समुचित, योग्य
approved variety, मान्य जात, मान्य वाण
apricot, *n.* जरदाळू (पु.)
Aprioni cinerea, (stem borer of apple) ॲप्रिओनी सिनेरिया (सफरचंदावरील खोड पोखर)
Apsylla cistellata, (mango apsylla) ॲप्सिला सिस्टेलेटा
aqua ammonia, ॲक्वा अमोनिआ
Aquarrosus, *n.* अक्वारोझस (न.)
aquatic bird, पाणपक्षी (पु.)
aqueduct, *n.* कुल्या (स्त्री.)
aqueous solution, जलयुक्त द्रावण, जलीय द्रावण
aquifer, *n.* जलधारी (पु.)
araban, *n.* ॲराबान (न.)
arabinose, *n.* अराबिनोज (न.)
arable land, कृष्य जमीन, कृषियोग्य भूमि
arachidic acid, ॲराकिडिक आम्ल
arbitrary correction, यादृच्छिक संशुद्धि
arbitration, *n.* लवाद (पु.)
arbor bolt, आर्बर बोल्ट
arbour, *n.* कुंज (पु.)
area, *n.* १ क्षेत्र (न.) २ क्षेत्रफळ (न.)
area statistics, क्षेत्रफळाचे आकडे
area under crop, पिकाखालील क्षेत्र
area under cultivation, लागवडीखालील क्षेत्र, वहितीखालील क्षेत्र
area under irrigation, जलसिंचन क्षेत्र, ओलिताचे क्षेत्र
areca nut, सुपारी (स्त्री.)
arecoline hydrobromide, ॲरीकोलाइन हायड्रोब्रोमाइड
Argemone maxicana, (mexican poppy) आर्जिमोन मॅक्सिकाना (कोरांटी)
arginase, *n.* आर्जिनेज (न.)
arid climate, शुष्क हवामान, कोरडे हवामान
arid region, शुष्क प्रदेश
aril, *n.* बीजचोल (पु.)
Aristida funiculata, ॲरिस्टिडा फ्युनिक्युलाटा
arithmetic mean, गणित माध्य, सरासरी माध्य, समांतर मध्य, सरासरी मध्य
arm, *n.* बाहु (पु.), भुजा (स्त्री.)
armature, *n.* कवच (न.), आर्मेचर (न.)
Armillaria, *n.* आर्मिलॅरिया (पु.)
Armsby's Feeding Standard, आर्म्सबीचे खाद्य मानक
arm type picker, दंताळे (न.)
aroma, *n.* सुगंध (पु.)
aromatic spirit of ammonia, अमोनियाचे सुगंधी स्पिरिट
arrangement, *n.* १ मांडणी (स्त्री.), रचना (स्त्री.) २ व्यवस्था (स्त्री.)
arrow, *n.* १ उसाचा फुलोरा (पु.) २ तीर (पु.), बाण (पु.)
arsenic, *adj.* आर्सेनिक
*n.* आर्सेनिक (न.)
artery forceps, धमनी चाप, धमनी चिमटा
artesian well, कारंजी विहीर
Arthrobacter, *n.* आर्थ्रोबॅक्टर (पु.)
Arthropoda, *n. pl.* आर्थ्रोपोडा (पु.), संधिपाद (पु.), प्राणिप्रसृष्टि (स्त्री.)
artichoke, *n.* आर्टिचोक (पु.)
articular facet, संधि-मुखिका (स्त्री.)
artificial farm manure, कंपोस्ट खत
artificial fertiliser = chemical fertiliser
artificial hybridisation, कृत्रिम संकरण
artificial innoculation, कृत्रिम संरोपण
artificial insemination, कृत्रिम रेतन

**artificial manure,** कृत्रिम खत
**artificial pollination,** कृत्रिम परागसिंचन
**artificial selection,** कृत्रिम निवड
**artificial silk,** कृत्रिम रेशीम
**artificial vagina,** कृत्रिम योनि
**Artocarpus altilis,** (bread fruit) आर्टोकार्पस अल्टिलिस
**Artocarpus heterophyllus,** (jack fruit) आर्टो-कार्पस हेटेरोफायलस (फणस)
**Artocarpus lakoocha,** आर्टोकार्पस लकूचा
**arum,** *n.* आरवी (स्त्री.), अळकुडी (स्त्री.)
**Arytania punctipemis,** ॲरिटेनिया पंक्टीपेमिस
**asafetida = asafoetida,** *n.* हिंग (पु.)
**ascigerous stage,** ॲस्कसधारी अवस्था
**ascites,** *n.* जलोदर (पु.)
**Ascochyta caricae,** ॲस्कोकायटा कॅरीसी
**Ascochyta phaseolorum,** (bean blight of matki) ॲस्कोकायटा फॅजिओलोरम (मटकी शेंगेवरील अंगक्षय)
**Ascochyta pinodeila,** (footrot and blight of pea) ॲस्कोकायटा पायनोडेला (वाटाणा शेंगेवरील मूलक्षय व अंगक्षय)
**Ascochyta pinodes,** (footrot and blight of pea) ॲस्कोकायटा पायनोडीज (वाटाणा शेंगेवरील मूलक्षय व अगक्षय)
**Ascochyta pisi,** (footrot and blight of pea) ॲस्कोकायटा पीसी (वाटाणा शेंगेवरील मूलक्षय व अंगक्षय)
**Ascochyta sorghi,** (ascochyta leaf spot of Johnson grass) ॲस्कोकायटा सोर्घाय (जॉन्सन गवतावरील पानचट्टा)
**Ascochyta sorghi,** (ascochyta leaf spot of Sudan grass) ॲस्कोकायटा सोर्घाय (सुदान गवतावरील पानचट्टा)
**Ascomycetes,** *n.* ॲस्कोमायसिटीज (न.)
**ascorbic acid,** ॲस्कॉर्बिक ॲसिड, ॲस्कॉर्बिक आम्ल
**asexual,** *adj.* अलिंगी, अलैंगिक
**asexual reproduction,** अलैंगिक प्रजनन
**ash,** *n.* राख (स्त्री.), रक्षा (स्त्री.)
**ash gourd,** खारे कोहळे
**ash metabolism,** राख चयापचय
**aspartic acid,** ॲस्पार्टिक आम्ल
**aspergillosis,** *n.* ॲस्पर्जिलस रोग (पु.)
**aspergillus,** *n.* ॲस्पर्जिलस (न.)
**Aspergillus clavatus,** ॲस्पर्जिलस क्लॅव्हॅटस
**Aspergillus flavas,** ॲस्पर्जिलस फ्लेवस
**Aspergillus fumigatus,** ॲस्पर्जिलस फ्यूमिगॅटस
**Aspergillus nidulans,** ॲस्पर्जिलस निडचुलन्स
**Aspergillus niger,** (black mould) ॲस्पर्जिलस नायगर (काळी बुरशी)
**Aspergillus ochraceus,** ॲस्पर्जिलस ऑक्रेसियस
**Aspergillus oryze,** ॲस्पर्जिलस ओराइजी
**Aspergillus sydowi,** ॲस्पर्जिलस सायडोवी
**Aspergillus terricola,** ॲस्पर्जिलस टेरीकोला
**Asphodilus tenuifolius,** (wild onion) ॲस्फो-डिलस टेन्युइफोलिअस (जंगली कांदा)
**asphyxia,** *n.* श्वासावरोध (पु.), गुदमरणे (न.)
**Aspidiotus cyanophylly,** (scale insect) ॲस्पी-डिऑटस सियानोफायली (शल्क कीट)
**Aspidiotus cydoniae,** (scale insect) ॲस्पी-डिऑटस सायडोनी (शल्क कीट)
**Aspidiotus spinosus,** काटेमळ (पु.)
**Aspidiotus tetaniae,** (scale insect) ॲस्पीडि-ऑटस टिटेनी (शल्क कीट)
**aspiration,** *n.* चूषण (न.)
**aspirin,** *n.* ॲस्पिरिन (न.)
**assembling,** *n.* जुळवणी (स्त्री.)
**assessed,** *adj.* आकारित
**assessed area,** आकारित क्षेत्र
**assessment,** *n.* (act of assessing) आकारणी (स्त्री.)
**assets,** *n.* १ मालमत्ता (स्त्री.) २ मत्ता (स्त्री.)
**assimilation,** *n.* सात्मीकरण (न.)
**assorting effect,** (water erosion) पृथक्करण प्रभाव

**assumption,** *n.* **कल्पना** (स्त्री.), **अभिगृहीत** (न.)
**assured mean, अभिगृहीत माध्य**
**aster,** *n.* **तारका** (स्त्री.)
**asthma,** *n.* **दमा** (पु.)
**astringent,** *adj.* **तुरट, कषाय**
**asynapsis,** *n.* **असूत्रयुग्मन** (न.)
**atavism,** *n.* **पूर्वजता** (स्त्री.)
**Athelia proxima,** (mustard saw-fly) **अॅथेलिया प्रॉक्झिमा** (मोहरीवरील करवती माशी)
**Atherigona atripalpus,** (jowar stem-fly) **अॅथेरिगोना अॅट्रिपॅल्पस** (ज्वारीवरील खोड माशी)
**atmosphere,** *n.* **वातावरण** (न.)
**atmospheric moisture, वातावरणीय ओलावा**
**atmospheric pressure, हवादाब** (पु.), **वातावरण दाब**
**atmospheric supply, वातावरणीय पुरवठा**
**atom,** *n.* **अणु** (पु.)
**atomic energy, अणु ऊर्जा**
**atomic theory, अणुसिद्धांत** (पु.)
**atomic weight, अणुभार** (पु.), **अणुभारांक** (पु.)
**atomize,** *v.t.* **अण्वीकरण करणे, कणीकरण करणे**
**atomizer,** *n.* **कणित्र** (न.)
**Atractomorpha crenulata,** (tobacco grasshopper) **अॅट्रॅक्टोमॉर्फा क्रेन्युलेटा** (तंबाखूवरील टोळ)
**at random, यादृच्छिक**
**Atriflex hortensis, चाकवत** (पु.)
**atrophy,** *n.* **अपुष्टि** (स्त्री.)
**atropine sulphate, अॅट्रोपिन सल्फेट**
**attachment,** *n.* **संलग्न** (न.)
**attack,** *n.* **हल्ला** (पु.)
**attendant bee, परिचर मधमाशी**
**attitude,** *n.* **अभिवृत्ति** (स्त्री.)
**attitude scale, अभिवृत्ति अनुमाप**
**attractant,** *n.* **आकृष्टक** (सा.), **आकर्षक** (सा.)
**attraction,** *n.* **आकर्षण** (न.)
**attribute 'A', गुण 'अ'**
**at will tenant, गैर मौरूसी शेतकरी**
**auction,** *n.* **लिलाव** (पु.)
  *v.t.* **लिलाव करणे**
**auctioneer,** *n.* **लिलाव करणारा** (पु.)
  *v.t.* **लिलाव करणे**
**auger,** *n.* **ऑगर** (न.), **गिरमिट** (न.)
**Aulacophora foveicollis,** (red pumpkin beetle) **ऑलेकोफोरा फोव्हीकॉलिस** (भोपळ्यावरील लाल भुंगेरा)
**Aulacophora intermedia,** (pumpkin beetle) **ऑलेकोफोरा इंटरमीडिया** (भोपळ्यावरील भुंगेरा)
**Aularches miliaris,** (coffee grasshopper) **ऑलॅर्कस मिलिअॅरिस** (कॉफीवरील टोळ)
**Aulsoria,** *n.* **ऑल्सोरिया** (पु.)
**auscultation,** *n.* **संश्रवण** (न.)
**autoallopolyploid,** *n.* **स्वयंपरबहुगुणित** (न.), **ऑटोअॅलोपॉलिप्लॉइड** (न.)
**autocatalytic reaction, स्वयं उत्प्रेरक अभिक्रिया**
**autochthonous bacteria, स्वस्थानिक जीवाणु**
**autoclave,** *n.* **ऑटोक्लेव्ह** (पु.)
**autoecious rust, एकाश्रयी तांबेरा**
**autogamy,** *n.* **स्वयंयुग्मन** (न.), **स्वयंफलन** (न.)
**autohaploid,** *n.* **स्वयित संख्यक** (पु.)
**autointoxication,** *n.* **स्वयं विषाक्तता** (स्त्री.)
**automatic duster = power duster**
**automatic seed drill, स्वयंपेरणी यंत्र**
**auto oxidation, स्वतः ऑक्सीकरण**
**autopolyploid,** *n.* **स्वबहुगुणित** (न.)
**autopsy,** *n.* **शवपरीक्षा** (स्त्री.)
**auto-regressive series, स्वसमाश्रयी श्रेणी**

autosome, *n.* अलिंगीसूत्र (न.), अलिंगगुणसूत्र (न.)
autotetraploid, *n.* स्वयंचतुर्गुणित (न.)
autotroph, *n.* स्वयंपोष्य (न.), स्वयंपोषी (पु.)
autotrophic, *adj.* स्वयंपोषित
autumn cultivation, शारदीय लागवड, शरत्कालीन लागवड
autumn flowering, शारदीय पुष्पन, शरत्कालीन पुष्पन
autumn season, शरद् ऋतु
auximone, *n.* ऑक्सिमोन (न.), वर्धिका (स्त्री.)
auxin, *n.* ऑक्सिन (न.)
available nutrients, उपलब्ध पोषक द्रव्ये
avenue, *n.* वृक्षवीथि (स्त्री.)
average, *n.* सरासरी (स्त्री.)
*adj.* सरासरी
average cost, सरासरी व्यय
average holding, सरासरी धारण जमीन
average return, सरासरी प्राप्ति
average size of holding, धारण जमिनीचे सरासरी क्षेत्र
Averrhoa carambola, (carmbola) करंबळ (स्त्री.)
avian leucocis complex, पक्ष्यांची रंगहीन पेशीवृद्धि
avitaminosis, *n.* व्हिटॅमिनशून्यता (स्त्री.)
avocado, *n.* ॲव्होकॅडो (न.)
awn, *n.* कुश (न.), कुसळ (न.)
awned wheat, कुसळी ओंबीचा गहू
awnless wheat, कुसळहीन ओंबीचा गहू
axe, *n.* कुऱ्हाड (स्त्री.)
axillary bud, कक्ष कलिका
axle, *n.* अक्षदंड (पु.), आस्कुड (न.)
axle box, आस्कुड पेटी
axle pin, आस्कुड खिळा
axle tree, अक्षवृक्ष
ayacut, *n.* आयाकट (पु.)
Azobacter, *n.* ॲझोबॅक्टर (पु.)
Azobacter agilis, ॲझोबॅक्टर ॲजिलिस
Azobacter beijerinckii, ॲझोबॅक्टर बार्यारिंकाई
Azobacter chroococcum, ॲझोबॅक्टर क्रोकोकम
Azobacter indicum, ॲझोबॅक्टर इंडिकम
Azobacter vinelandii, ॲझोबॅक्टर विनेलँडाई
Azobacter vitreum, ॲझोबॅक्टर व्हिट्रियम
azofication, *n.* ॲझोफिकेशन (न.)
azohydrase, *n.* ॲझोहायड्रेज (पु.)
azonal soil, अस्तरित मृदा
azotase, *n.* ॲझोटेज (पु.)

# B

**babcock test**, बॅबकॉक परीक्षण
**Bacillariaece**, *n. pl.* बॅसिलेरिएसी (न.)
**Bacillus**, *n.* १ बॅसिलस (पु.) २ दंडाणु (पु.)
**Bacillus agri**, बॅसिलस अॅग्री
**Bacillus amylovorus**, बॅसिलस अॅमाइलोव्होरस
**Bacillus anthracis**, बॅसिलस अॅन्थ्रासिस
**Bacillus arborescens**, बॅसिलस आर्बोरेसेन्स
**Bacillus asterosporous**, बॅसिलस अॅस्टेरोस्पोरस
**Bacillus botulinus**, बॅसिलस बॉट्यूलिनस
**Bacillus brevis**, बॅसिलस ब्रेव्हिस
**Bacillus campestris**, बॅसिलस कॅम्पेस्ट्रिस
**Bacillus cellulosae dissolvens**, बॅसिलस सेल्युलोजी डिझाल्व्हेन्स
**Bacillus cellulosam fermentans**, बॅसिलस सेल्युलोजम फर्मेटेन्स
**Bacillus cereus**, बॅसिलस सिरस
**Bacillus cohaerens**, बॅसिलस कोहिरन्स
**Bacillus cyanogenese**, बॅसिलस साईनोजिनिस
**Bacillus fusiformis**, बॅसिलस फ्यूजीफॉर्मिस
**Bacillus janthinus**, बॅसिलस जॅन्थिनस
**Bacillus macerans**, बॅसिलस मॅसीरन्स
**Bacillus megatherium**, बॅसिलस मेगॅथेरिअम
**Bacillus mesentericus**, बॅसिलस मिझेन्टेरिकस
**Bacillus mycoides**, बॅसिलस मायकॉइडीस
**Bacillus nitrosus**, बॅसिलस नायट्रोसस
**Bacillus petasites**, बॅसिलस पेटॅसायटीस
**Bacillus polymyta**, बॅसिलस पॉलीमायटा
**Bacillus radicicola**, बॅसिलस रॅडिसिकोला
**Bacillus simplex**, बॅसिलस सिंप्लेक्स
**Bacillus stutzeri**, बॅसिलस स्टुटझेरी
**Bacillus synanthus**, बॅसिलस सायनॅन्थस
**Bacillus viscosus**, बॅसिलस व्हिस्कॉसस
**Bacillus vulgatus**, बॅसिलस व्हल्गॅटस
**back**, *n.* पृष्ठ (न.), पाठ (स्त्री.)
*adj.* पश्च, पूर्व–
**back cross**, पूर्व (पिढी) संकर
**back crossing**, पूर्व संकरण, पूर्व संकर
**backfurrow**, *n.* पाळ (स्त्री.)
**backward stroke**, मागचा धक्का
**bacteria**, *n. pl.* (*sing.* bacterium) जीवाणू (पु.अ.व.)
**bacterial**, *adj.* जीवाणु–
**bacterial activity**, जीवाणु क्रियाशीलता
**bacterial count**, जीवाणु गणना
**bacterial counting**, जीवाणु गणन
**bacterial culture**, जीवाणु संवर्ध
**bacterial growth**, जीवाणु वृद्धि
**bacterial gummosis**, बॅक्टेरिअल डिंक्या
**bacterial standard**, जीवाणु प्रमाण
**bacteriocidal**, *adj.* जीवाणुनाशी, जीवाणुनाशक
**bacteriocidal substance**, जीवाणुनाशक पदार्थ
**bacteriologist**, *n.* जीवाणुशास्त्रज्ञ (सा.)
**bacteriology**, *n.* जीवाणुशास्त्र (न.)
**bacteriophage**, *n.* जीवाणुभक्षी (पु.)
**bacteriosis**, *n.* (*pl.* bacterioses) जीवाणुरोग (पु.)
**bacteriostatic factor**, (bacteriostasis) जीवाणुनिरोधी कारक
**bacterium**, *n.* (*pl.* bacteria) जीवाणु (पु.)
**Bacterium acidi**, बॅक्टेरियम अॅसिडी
**Bacterium denitrofluorescens**, बॅक्टेरियम डीनायट्रोफ्लुओरेसन्स
**Bacterium globiome**, बॅक्टेरियम ग्लोबीओमी
**Bacterium lactis**, बॅक्टेरियम लॅक्टिस
**Bacterium parvalum**, बॅक्टेरियम पार्व्हलम
**Bacterium radicicola**, बॅक्टेरियम रॅडिसिकोला
**Bacterium tumefaciens**, बॅक्टेरियम ट्यूमिफॅसिअन्स
**Bacterium vulpinus**, बॅक्टेरियम व्हल्पायनस
**bacterization**, *n.* जीवाणु निवेशन (न.)

